विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण, अहमदनगर यांचे अधिपत्याखालील १) वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, नेवासा, २)वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण,राहाता, ३)वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, श्रीरामपूर व ४)वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण,शेवगाव या पदनामास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०१९/प्र.क्र.०३/फ-२
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २४ जानेवारी, २०१९

संदर्भ :- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा-प्र.५ दि. ०४.०१.२००६.

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.आस्था-२०१६/प्र.क्र.१६/फ-१२, दि.३०.०३.२०१७.

३) महसूल व वन विभाग,शासन निर्णय, क्र.एफएसटी-०५/१८/प्र.क्र.२७९/फ-४, दि.३०.०६.२०१८.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.१५/(भाग-३)/१४-१५/६०७/२०१८-१९, दि.२६.११.२०१८

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय.) सामाजिक वनीकरण, म. रा., पुणे यांच्या कार्यालयाचे क्र. कक्ष-६/लेखा/१३९८/२०१८-१९ दि. १३/११/२०१८

प्रस्तावना -

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५(३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

२. त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.४ येथील दि.२६.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानूसार तसेच संदर्भ क्र.४ येथील अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय.) सामाजिक वनीकरण, पुणे यांनी यांच्या दि.१३.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानूसार त्यांच्या अधिपत्याखालील १)वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, नेवासा २) वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, राहाता ३) वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, श्रीरामपूर व ४) वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, शेवगाव या पदनामास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. तदअनुषंगाने सदरहू पदनामास "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाने संदर्भ क्र.४ येथील दि.२६.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय.) सामाजिक वनीकरण, पुणे यांनी त्यांच्या दि.१३.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन खालील पदांना वित्त विभागाच्या दि.०४.०१.२००६ रोजीच्या शासन निर्णयानूसार त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्याची देयके पारीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

| वनवृत्त कार्यालय | आहरण व संवितरण अधिकारी घोषित करावयाचे पदनाम | मुख्यालय ठिकाण | जवळचे उपकोषागार कार्यालय व सांकेतांक क्र. |
|---|---|---|---|
| वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, नाशिक. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण, अहमदनगर | वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, नेवासा | नेवासा | नेवासा ५४०६ |
| | वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, राहता | राहाता | राहाता ५४१४ |
| | वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, श्रीरामपूर | श्रीरामपूर | श्रीरामपूर ५४१३ |
| | वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण, शेवगाव | शेवगाव | शेवगाव ५४११ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१९०१२४१५३८२२९४१९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.01.24 15:46:39 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति -**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.),नाशिक.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
(त्यांना विनंती करण्यात येते कि, महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १५(२) व १५ (३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पुढील कार्यवाही करण्यात करावी.)
५. संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.
६. वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
८. उप कोषागार अधिकारी, नेवासा/राहता/श्रीरामपूर/शेवगाव
९. सहसंचालक, (तांत्रिक) लेखा व कोषागार, मुंबई.
१०. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.